मौजे लोहगाव ता.कन्नड जि.औरंगाबाद ) नळ पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः पापुयो-२०१५/ प्र.क्र.१७७/ पा.पु.१८**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०३ सप्टेबर, २०१५

**वाचा**

मुख्य कार्यकारी अधिकारी जि.प.औरंगाबाद यांचे जा.क्र.जिपऔ/पापु/तांशा/२०१५/ १७०० दि. २०.८.२०१५

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे लोहगाव ( ता.कन्नड जि. औरंगाबाद ) येथील नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. १,०५,९७,९३७/- इतक्या खर्चाच्या मूळ योजनेच्या अंदाजपत्रकास शासनाने दिनांक ४.२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता दिली होती. सदर योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणाने वाढ झाल्यामुळे संदर्भाधिन पत्र क्र. १ अन्वये मौजे लोहगाव नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१,२१,६६,७९४/- (ढोबळ) रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. त्यानुषंगाने मौजे लोहगाव नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१,२१,६६,७९४/- (रू. एक कोटी एकवीस लक्ष सहासष्ट हजार सातशेचौ-यान्नव फक्त) इतक्या ढोबळ रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता, मौजे लोहगाव ( ता.कन्नड जि. औरंगाबाद ) नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु.१,२१,६६,७९४/- (रू. एक कोटी एकवीस लक्ष सहासष्ट हजार सातशे चौ-यान्नव फक्त ) इतक्या ढोबळ रकमेच्या सुधारीत अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधीन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१) उपरोक्त नमुद रु.१,२१,६६,७९४/- या सुधारित किंमतीत उर्वरित कामे पूर्ण करावीत. तसेच प्रस्तुत योजनेच्या खर्चात वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

२) या योजनेस प्रशासकीय मंजुरी दिलेल्या मूळ पत्रात तसेच सुधारीत तांत्रिक मान्यता देताना विहीत करण्यात आलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३) ही योजना पूर्ण झाल्यावर ती लोहगाव ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद,औरंगाबाद यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास लोहगाव ग्रामपंचायत/जिल्हा परिषद औरंगाबाद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच

कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद औरंगाबाद व लोहगाव ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४) ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी, योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी लोहगांव ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५) महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वयंनिर्भर होईल याची जबाबदारी जिल्हा परिषद औरंगाबाद व लोहगांव ग्रामपंचायत यांची राहील. योजना स्वंयनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वेळोवेळी वाढ करणे लोहगाव ग्रामपंचायत यांना बंधनकारक राहिल.

६) सदर योजना डिसेंबर, २०१५ अखेर पूर्ण करण्यात येऊन योजनेची लेखे जोखे बंद करण्यात यावीत.

७) सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने (संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील.

८) योजना कोणत्याही परिस्थितीत पुनर्सुधारीत करण्यात येऊ नये.

या योजनेवरील सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु. १५,६८,८५७/- (रुपये. पंधरा लक्ष अडुसष्ट हजार आठशे सत्तावन फक्त) हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून जिल्हा परिषदेस उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.**

प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि.१७/०४/२०१५ रोजीच्या क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र. ३०/ २०१३/ विनियम, भाग-२ या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील अ.क्र.६ (सहा) परिच्छेद क्र.२७ (अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०३१५३५३०९२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sangar Vandana S

Digitally signed by Sangar Vandana S
DN: c=IN, o=Govt. of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Sangar Vandana S
Date: 2015.09.03 15:38:32 +05'30'

**( वंदना सनगर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा. विधानसभा/ विधानपरिषद सदस्य (सर्व)

३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
५) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २,
६) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र -१, मुंबई / महाराष्ट्र २, नागपूर.
७) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
८) जिल्हाधिकारी, औरंगाबाद.
९) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी.बिल्डींग स्वारगेट, पुणे.
१०) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पा.पु.व स्व.वि., यांचे स्वी.सहा. मंत्रालय, मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, औरंगाबाद.
१२) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१३) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, औरंगाबाद.
१४) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, औरंगाबाद.
१६) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,०७,०९,१०,१३ व १७ पा.पु.व स्व.वि., मंत्रालय, मुंबई
१७) निवड नस्ती पापु-१८